**स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**चांदवड नगरपरिषद, जिल्हा नाशिक.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२१/प्र.क्र.१५०/नवि-३४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई- ४०००३२.

**दिनांक: ८ फेब्रुवारी, २०२२**

**वाचा:-**

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि. १५ मे, २०१५

२) स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दि. ३०/०८/२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दि. ८/११/२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

चांदवड नगरपरिषदेच्या रूपये २.९३ कोटी किंमतीच्या नागरी घनकचरा व्यवस्थापनाचा सविस्तर प्रकल्प अहवाल दिनांक ३०/०८/२०१९ रोजी संपन्न झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. सदर बैठकीत उच्चाधिकार समितीने चांदवड नगरपरिषदेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास मान्यता प्रदान केली होती. या प्रकल्प अहवालास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातर्फे तांत्रिक मंजुरी प्राप्त झाल्यानंतर दिनांक ८/११/२०२१ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या सुधारित किंमतीसह हा प्रकल्प बैठकीत पुहा ठेवण्यात आला होता. सदर बैठकीत उच्चाधिकार समितीने चांदवड नगरपरिषदेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास रु. ३.३५ कोटी इतक्या सुधारित किंमतीसह मान्यता प्रदान केली आहे.

**शासन निर्णय :-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत चांदवड नगर परिषदेच्या या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रात नमूद एकूण रुपये ३.३५ कोटी किंमतीच्या नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास पुढील परिच्छेद ४ मध्ये नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मंजूरी देत आहे.

२. चांदवड नगर परिषदेचा नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाचा मंजूर वित्तीय आकृतीबंध पुढीलप्रमाणे राहील:

**(रुपये कोटीत)**

| प्रकल्पाची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्पाच्या मूळ मंजूर किंमतीच्या ३५%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्पाच्या मूळ मंजूर किंमतीच्या २३.३%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ३.३५ | १.०२५ | ०.६८५२ | १.६३९८ (१४ वा वित्त आयोग / नगरपरिषद निधीमधून) |

**३. निधी वितरणाची कार्यपध्दती** :

३.१ केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र व राज्य शासनाचा वितरीत केला जाईल.

३.२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३.३ सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

३.४ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३.५ स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत मंजूर घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त उर्वरित निधी (उपरोक्त तक्त्यातील रकाना ५ नुसार) संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेने उभारून केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणात खर्च करणे आवश्यक राहील.

३.६ स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्थेने स्व:हिश्याचा निधी उभारून, सदर एकत्रित खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

३.७ सदर प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याच्या प्रथम हप्त्याचा निधीचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर केल्यानंतर दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

**४.अटी व शर्ती**:

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा चांदवड नगरपरिषद राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ चा शासन निर्णय व घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ नुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये करणे, कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ या प्रकल्प अहवालाची यशस्वीता ही घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागीच विलगीकरण करण्यावर आधारित आहेत. त्यामुळे शहरात निर्माण होणाऱ्या १००% घनकचऱ्याचे निर्मीतीच्या जागीच विलगीकरण करून, तो कचरा वेगवेगळा संकलीत करणे अत्यावश्यक राहील.

४.४ या विलगीकरण केलेल्या ओल्या कचऱ्यावर प्रक्रीया सुरू करणे बंधनकारक राहील.

४.५ या विलगीकरण केलेल्या कचऱ्याची वाहतूक व त्यावर करावयाची शास्त्रोक्त प्रक्रीया या बाबीची सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट बाबींची विहित कालावधीमध्ये अंमलबजावणी करण्याची जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.६ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद उपकरणे/मशीन/यंत्रे इत्यादी ची खरेदी Government eMarketplace (GeM) पोर्टल वरूनच करणे बंधनकारक राहील. याशिवाय इतर पद्धतीचा अवलंब करून खरेदी केल्यास, ती आर्थिक अनियमितता समजून शासनामार्फत पुढील उचित कार्यवाही करण्यात येईल.

४.७ सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करताना पुढील १० वर्षाची आवश्यकता विचारात घेवून तयार केलेला आहे. या प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी सुरू करताना सध्याची आवश्यकता विचारात घेवूनच आवश्यक खरेदी व बांधकामे करण्यात यावीत.

४.८ प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर सक्षम प्राधिकाऱ्याने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.९ घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

५. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत चांदवड नगरपरिषद च्या घनकचरा व्यवस्थापनासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत असलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी करताना पुढील प्रमाणे निश्चित केलेले उद्दिष्ट पूर्ण करणे (Outcome base) कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.:-

- शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागी १००% विलगीकरण (at Source Segregation) करणे.
- विलगीकरण केलेल्या १००% कचऱ्याची विलगीकृत पध्दतीने वाहतूक करणे.
- ओल्या कचऱ्यापासून कंपोस्ट खत निर्मिती करणे अथवा त्यावर बायोमिथेनायझेशन पध्दतीने प्रकिया करणे.
- खत निर्मिती करण्यात येत असेल तर, ओल्या कचऱ्यापासून निर्माण केलेल्या सेंद्रिय खताची FCO मानकानुसार राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या प्रयोगशाळेमधून तपासणी करून घेवून त्यास “हरित महासिटी कंपोस्ट” हा ब्रँड मिळविणे. तसेच या सेंद्रिय खताची “हरित महासिटी कंपोस्ट” या नावाने विक्री करणे.
- सुक्या कचऱ्याचे पदार्थ पुनर्प्राप्ती सुविधा केंद्रावर (Material Recovery Facility) दुय्यम विलगीकरण (Secondary Segregation) करावे. यापैकी पुनर्वापर होऊ शकणाऱ्या सुक्या कचऱ्याचा पुनर्वापर करावा अथवा शक्य असल्यास त्याची विक्री करावी.
- उपरोक्त सर्व प्रक्रीयांनंतर शिल्लक राहणाऱ्या उर्वरित कचऱ्याची भराव भूमीवर विल्हेवाट लावणे बंधनकारक राहील.

६. उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील नमूद करण्यात आलेल्या बाबी व त्यांच्या किंमतींस शासन मंजूरी देत आहे. सदर बदलामुळे नगरपरिषदेच्या घनकचऱ्याच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील रकाना ४ मध्ये दर्शविण्यात आल्यानुसार राहील. सदर सुधारित सविस्तर प्रकल्प अहवालाचा वाढीव खर्च नगरपरिषदेने १४ व्या वित्त आयोगातंर्गत प्राप्त निधी किंवा स्वनिधीतून करावा.

७. संदर्भीय क्रमांक २ येथील प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०८१९५३३३२६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, serialNumber=eeec7a4defed4a9827acaa40b255e88289e62111c82bcdb7dd2fe58860768930, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2022.02.09 11:07:16 +05'30'

**(अजित पालवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५) प्रधान सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

८) आयुक्त तथा संचालक, महानगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.

९) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.

१०) जिल्हाधिकारी, नाशिक.

११) जिल्हा प्रशासन अधिकारी, नाशिक

१२) मुख्याधिकारी, चांदवड नगरपरिषद

१३) निवडनस्ती, नवि-३४.

(शासन निर्णय क्रमांक:- स्वमअ-२०२१/प्र.क्र.१५०/नवि-३४ दिनांक: ८ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे विवरणपत्र)

(किंमत लाखात)

| SN | Component | Cost (in Rs. Cr.) |
|---|---|---|
| 1 | 4-wheeler autor tippers: 6 no. | 0.498 |
| 2 | Wheelbarrow 6 no | 0.0063 |
| 3 | Roadside twin bins with stand 40 no. | 0.0218 |
| 4 | Screening machine with belt conveyer | 0.16 |
| 5 | Single Shaft Shredder | 0.16 |
| 6 | Simple Processing Machine | 0.07 |
| 7 | Plastic Bailing Machine | 0.0478 |
| 8 | Fire Extinguisher 10 no | 0.0043 |
| 9 | Weigh Bridge | 0.0571 |
| 10 | Backhoe Loader | 0.3025 |
| 11 | Water Tanker | 0.0922 |
| 12 | Boundary wall | 0.3901 |
| 13 | Green Area | 0.0023 |
| 14 | Waste Receiving & Pre-sorting area | 0.0266 |
| 15 | Curing platform | 0.0472 |
| 16 | Windrow platform | 0.3075 |
| 17 | Road 7m wide | 0.0227 |
| 18 | Road 3.5m wide | 0.0347 |
| 19 | Process reject platform | 0.146 |
| 20 | Leachate tank | 0.0175 |
| 21 | Drainage work | 0.0625 |
| 22 | Drainage work | 0.028 |
| 23 | Wet Waste Processing Shed | 0.2089 |
| 24 | Dry Waste Processing Shed | 0.2089 |
| 25 | Office | 0.0333 |
| 26 | Rest Rooms | 0.0328 |
| 27 | Weigh bridge room | 0.0324 |
| 28 | Toilet | 0.0363 |
| | **Cost of Project** | **3.0577** |
| 29 | IEC | 0.30 |
| | **Total** | **3.3577** |